आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील उर्वरीत निधी वितरण..
(लेखाशीर्ष २२२५ एफ ०९४)

**महाराष्ट्र शासन.**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१९/ प्र.क्र. ०३ / कार्यासन.६**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-** ४०० ०३२
**दिनांक:** १४ जानेवारी, २०२०

वाचा -

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०१.०४.२०१९.

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८.०७.२०१९.

३) शासन निर्णय,आ.वि.वि. क्र.बीयुडी-२०१९/प्र.क्र.०३/का.६ ,दि.२०.०७.२०१९.

४) आदिवासी विकास विभाग, नस्ती क्र.शिष्यवृ-२०१९/प्र.क्र.१८०/का-१२.

**शासन निर्णय-**

सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागासवर्गीय कल्याण शीर्षांतर्गत योजनांच्या अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी वित्त विभागाच्या विहीत ६०% मर्यादेत निधी संदर्भाधीन क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये संबंधित नियंत्रक अधिकारी यांना वितरीत करण्यात आला आहे. संदर्भाधीन क्र.४ येथील नस्ती अन्वये विनंती करण्यात आल्यानुसार आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२० या आर्थीक वर्षात मागणी क्र.टी-५ अंतर्गत **(०१) (७०) शिक्षण फी व परिक्षा फी प्रदाने (२२२५ एफ ०९४), ३४-शिष्यवृत्ती व विद्यावेतने** खाली रु. २२००.०० लाख अर्थसंकल्पीत तरतुदीतुन उर्वरीत ४० टक्के पैकी **रु.३,५५,४२,५६१/-(अक्षरी रूपये तीन कोटी पंचावन्न लाख बेचाळीस हजार पाचशे एकसष्ट फक्त)** इतका निधी नियंत्रक अधिकारी तथा आयूक्त, आदिवासी विकास,नाशिक यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. यानुषंगाने संगणक वितरण प्रणालीवर उपलब्ध कॅश फ्लो प्रमाणे खर्च करण्याची दक्षता सर्व संबंधितांनी घ्यावी.

३. नियंत्रक अधिकारी यांनी उपलब्ध करुन देण्यात आलेली तरतूद त्यांच्या अधिपत्याखालील आहरण व संवितरण अधिका-यांना अर्थसंकल्पीय नियम पुस्तीकेतील दिलेल्या सुचनांप्रमाणे तात्काळ वितरित करावी. तसेच सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिका-यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०८.०७.२०१९ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.०८/०७/२०१९ रोजीच्या शासनपरिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात व दि.०९.०१.२०२०/व्यय १४ च्या टिप्पणीन्वये वित्त विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१०७१७३१३३२१२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Kiran Kisanrao Pawar

Digitally signed by Kiran Kisanrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, cn=Kiran Kisanrao Pawar
Date: 2020.01.14 17:27:28 +05'30'

**( किरण कि.पवार )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयूक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
२. अपर आयूक्त, आदिवासी विकास ,नाशिक/नागपूर/ठाणे/अमरावती.
३. संचालक, लेखा व कोषागरे, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई-३२
४. महालेखापाल (लेखापरिक्षण) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर.
५. अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई.
६. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
८. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती (का-६).